**मोटार अपघात दावा न्यायाधिकरण,**
**नागपूर यांच्या आस्थापनेवरील २४**
**अस्थायी पदांना मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. एमसीटी-२०१६/प्र.क्र.७५/परिवहन-५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : १० ऑक्टोबर, २०१९.

वाचा : १) गृह विभाग, शासन अधिसूचना क्र. एमसीटी-०१/२०००/९३/सीआर-१६/परि-५, दिनांक २९.०९.२००१
२) गृह विभाग, शा.नि. क्र. एमसीटी-०१/२०००/९३/सीआर-१६/परि-५, दिनांक ०५.११.२००१.
३) गृह विभाग, शा.नि. क्र. एमसीटी-२०१६/प्र.क्र.७५/परिवहन-५, दिनांक ०४.०४.२०१८
४) सदस्य, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण तथा प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, नागपूर यांचे पत्र जा.क्र.३७२/२०१९, दिनांक २२.०८.२०१९.
५) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ११.०९.२०१९.

**प्रस्तावना :**

उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील शासन अधिसूचनेन्वये नागपूर जिल्ह्यासाठी दोन स्वतंत्र मोटार अपघात दावा न्यायाधिकरणे स्थापन करण्यात आली आहेत. सदर न्यायाधिकरणांकरिता संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये एकूण २४ अस्थाई पदे निर्माण करण्यात आली आहेत. सदर न्यायाधिकरणाच्या आस्थापनेवरील २४ अस्थायी पदांना संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये दिनांक ०१.०३.२०१९ ते ३०.०९.२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. सदर २४ पदांची मुदतवाढ दिनांक ३०.०९.२०१९ रोजी संपुष्टात येत असल्याने तसेच संदर्भ क्र. ४ येथील दिनांक २२.०८.२०१९ च्या पत्रान्वये सदस्य, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण तथा प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, नागपूर यांनी सदर २४ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला असल्याने उक्त पदांना दिनांक ०१.१०.२०१९ ते २९.०२.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, नागपूर या कार्यालयाच्या आस्थापनेवरील २४ अस्थायी पदांना दिनांक ०१.१०.२०१९ ते २९.०२.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे. सदर मुदतवाढ ही न्यायाधिकरणाकडे प्रलंबित असलेले दावे त्वरीत निकाली काढण्याच्या तसेच निकाली काढलेल्या दाव्यांचे विवरणपत्र प्रत्येक तीन महिन्यानंतर शासनास सादर करण्याच्या अटींच्या अधिन राहून देण्यात येत आहे. पदांचा तपशिल खालीलप्रमाणे :-

| अ.क्र. | पदाचे नांव | पद संख्या | पदे निर्माण केलेल्या शासन निर्णयाचा क्र. व दिनांक |
|---|---|---|---|
| १ | सदस्य | २ | शा. नि. गृह विभाग क्र. एमसीटी-०१/ २०००/ ९३/ प्र.क्र. १६/ परि- ५, दि ०५.११.२००१ |
| २ | प्रबंधक | २ | वरीलप्रमाणे. |
| ३ | उच्च श्रेणी लघुलेखक | २ | वरीलप्रमाणे. |
| ४ | वरिष्ठ श्रेणी लिपिक | २ | वरीलप्रमाणे. |
| ५ | कनिष्ठ श्रेणी लिपिक | ६ | वरीलप्रमाणे. |
| ६ | बेलिफ | ४ | वरीलप्रमाणे. |
| ७ | हवालदार | २ | वरीलप्रमाणे. |
| ८ | शिपाई | ४ | वरीलप्रमाणे. |
| **एकूण पदे** | | **२४** | |

उपरोक्त प्रयोजनावरील खर्च "मागणी क्र. बी-३, २०४१, वाहनांवरील कर, (००) ८००, इतर खर्च, (००) (०१) मोटार अपघात दावा न्यायाधिकरण (२०४१ ०१२५)" या लेखाशिर्षाखालील सन २०१९-२० या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ११.०९.२०१९ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१९१०१०१७३३२७६२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Jaysen
Jayprakash Ingole

Digitally signed by Jaysen Jayprakash Ingole
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e1cc346c90ac68bdb6b1a84cb00c640524cb8ed1b6ae18a394fb20420edf51af, serialNumber=7c9e48ac69f313deeccd6e9eeceea57a822c9d8ccacd64dd1c5031b045e7c1f2, cn=Jaysen Jayprakash Ingole
Date: 2019.10.10 17:37:02 +05'30'

**( जयसेन जयप्रकाश इंगोले )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. अध्यक्ष, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण तथा विभाग प्रमुख, मुंबई.

२. सदस्य, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण तथा प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, नागपूर.

३. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील साईड), मुंबई.

४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.

५. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.

६. वित्त विभाग (व्यय-८/ वित्तीय सुधारणा), मंत्रालय, मुंबई.

७. गृह विभाग (बीयुडी-१), मंत्रालय, मुंबई.

८. निवड नस्ती/ परिवहन-५.